# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्र. पोप्रमा-०९१६/प्र.क्र.६४७/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २ ऑगस्ट २०१७.

**विषय** :- अपर पोलीस अधीक्षक, उस्मानाबाद, यांच्याकरिता शासकीय निवासस्थानाचे बांधकाम करण्यासाठी नव्याने प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०७०२/प्र.क्र.८९/७४५/पोल-७, दिनांक ०७.०४.२००४.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ अ.पो.अ.उस्मानाबाद-निवा-बांधणे/ २४/०२ , दिनांक ०३.०५.२०१६.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ अ.पो.अ.उस्मानाबाद-निवा-बांधणे/ २४/०२ , दिनांक ०७.११.२०१६.

**ज्ञापन:-**

अपर पोलीस अधीक्षक, उस्मानाबाद, यांच्याकरिता शासकीय निवासस्थानाचे बांधकाम करण्यासाठी शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०७०२/प्र.क्र.८९/७४५/पोल-७, दिनांक ०७.०४.२००४, द्वारे **रु.१३,००,४८७/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाच्या दिंनांक ०६.०४.२०१५ रोजीच्या आदेशान्वये **रु.१३.१५ लक्ष** इतका निधी उपलब्ध करण्यात आला होता. तथापि, कार्यादेश (Work Order) देण्यात आले नसल्याने उक्त काम सुरु झालेले नाही.

३. दरम्यान, पोलीस महासंचालक यांच्या कार्यालयाने दिनांक ०३.०५.२०१६ रोजीच्या संदर्भाधीन पत्राद्वारे दरवाढ विचारात घेऊन **रु.५७.२७ लक्ष** इतक्या खर्चाचे सुधारित अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम, उपविभाग क्रमांक-१, उस्मानाबाद, यांनी सन २०१५-१६ च्या जिल्हा दरसूचीनुसार तयार केले असून ते **(१)** कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद आणि **(२)** पोलीस अधीक्षक, उस्मानाबाद, यांनी साक्षांकित केले आहेत.

४. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.६६.५९ लक्ष** असे सुधारित केले आहे व त्याप्रमाणे (नवीन) प्रशासकीय मान्यता देण्यास, पुढील अटींवर, सहमती दिली आहे:-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुविशारदाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत खातरजमा करुन घ्यावी.

३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

४) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये.

५) उक्त रकमेच्या मर्यादेत, उक्त बांधकाम हे शासन मान्य नकाशांप्रमाणे करावे (महाराष्ट्र राज्य पोलीस गृह निर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित यांनी प्रस्तावित केलेले).

**५.** त्या अनुसार, शासन निर्णय, गृह विभाग, सीआरपी-०७०२/प्र.क्र.८९/७४५/पोल-७, दिनांक ०७.०४.२००४, यास अधिक्रमित करुन, अपर पोलीस अधीक्षक, उस्मानाबाद, यांच्याकरिता शासकीय निवासस्थानाचे बांधकाम करण्याकरिता, परिच्छेद ४ मध्ये नमूद केलेल्या अटींवर, याद्वारे, नव्याने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**६.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग, मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे (योजनांतर्गत) (४०७० ०१५१), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**७.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२७/इमा-२, दिनांक २२.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**८.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०२१५११३९०८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.02 15:13:43 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.

३) विशेष पोलीस महानिरीक्षक, औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद.

४) पोलीस अधीक्षक, उस्मानाबाद.

५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.

८) निवड फाईल (पोल-७).